**सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) संवर्गातून**
**उप अभियंता (विद्युत) या पदावर पदोन्नती**
**सन २०२०-२१ ची निवडसुची**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश, क्रमांकः पीओजी-२०२१/प्र.क्र.१४६ /सेवा-२**
हुतात्मा राजगुरु मार्ग, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई
दिनांक: १३.१०.२०२१

## शासन आदेश

सन २०२०-२१ च्या निवडसूचीतील खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) (पदवीधर) यांना उप अभियंता (विद्युत) पदावर वेतनस्तर एस-२० रु. ५६६००-१७७५०० या वेतनश्रेणीत या ओदशान्वये जेष्ठतेनुसार, तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नती उपरांत उप अभियंता (विद्युत) म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावांसमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) यांचे नांव व जात प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसुली विभाग | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | श्री. गणेश हरिदास चंदनशिव | कोकण-२ | उप अभियंता (विद्युत), मंत्रालय विद्युत उप विभाग, मुंबई |
| २. | श्री.अतुल सु.जकाते इ.मा.व. | पुणे | श्री. जकाते यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वंतत्रपणे निर्गमित करण्यात येतील. |
| ३. | श्री.बळवंत रामराव काकडे | कोकण-२ | उप अभियंता (विद्युत), मुख्य अभियंता (विद्युत) कार्यालय, मुंबई |
| ४. | श्री.अशुतोष रज्जनलाल व्दिवेदी | कोकण-२ | उप अभियंता (विद्युत), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली विद्युत उप विभाग |
| ५. | श्रीम.दिपाली दुर्गादास रेवलकर | औरंगाबाद | सहायक अधीक्षक अभियंता (विद्युत), दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, औरंगाबाद |
| ६. | श्री.अमोल अच्युतराव श्रोते | औरंगाबाद | उप अभियंता (विद्युत), हिंगोली विद्युत उप विभाग |
| ७. | श्री.तोसिफ याकुब दारुवाले इ.मा.व. | औरंगाबाद | उप अभियंता (विद्युत), औरंगाबाद विद्युत उप विभाग क्र.२ |

| अ.क्र. | सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) यांचे नांव व जात प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसुली विभाग | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| ८. | श्री.किशोर आसाराम येसनसुरे वि.मा.प्र. | नागपूर | उप अभियंता (विद्युत), गोंदिया विद्युत उप विभाग |
| ९. | श्री.राहुल अर्जुनराव कांबळे अ.जा. | कोकण-१ | उप अभियंता (विद्युत), सिंधुदूर्ग विद्युत उप विभाग |
| १०. | श्री.विजय रामदास सानप भ.ज.(ड) | नागपूर (चक्राकार-१) | उप अभियंता (विद्युत), वैद्यकीय महाविद्यालय विद्युत उप विभाग, नागपूर |
| ११. | श्री.संतोष प्रभाकर वाडीभस्मे (इ.मा.व.) | अमरावती | उप अभियंता (विद्युत), अमरावती विद्युत उप विभाग |
| १२. | श्री.सन्नी लक्ष्मण अवसरे (इ.मा.व.) | नाशिक (चक्राकार-१) | उप अभियंता (विद्युत), मालेगांव विद्युत उप विभाग जि. नाशिक |

२. श्री. अतुल सु. जकाते यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. उपरोक्त सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) यांना पुढील अटींच्या अधीन राहून उप अभियंता (विद्युत) या पदावर पदोन्नती देण्यात येत आहे:-

१. पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाजेष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

२. सदर तात्पुरत्या पदोन्नत्या या रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५.५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर रिट याचिकेत होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील.

३. सदर पदोन्नती दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि.२२.७.२०२१ रोजीच्या निर्णयानुसार दिव्यांग आरक्षणासह पदोन्नतीसाठीची सर्व रिक्त पदे भरण्याबाबत सा.प्र.वि./ १६-अ यांनी दि.०५.७.२०२१ रोजीचा शासन निर्णय व दि.२३.७.२०२१ च्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार देण्यात येत आहे.

४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४. उपरोक्त नमूद अभियंत्यांविरूध्द, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित /न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल नसल्याच्या अटीच्या अधीन राहून सदर पदस्थापना आदेश निर्गमित करण्यात येत आहेत. तथापि, यापैकी एखादया अभियंत्याच्या

विरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी/ न्यायालयीन प्रकरण/FIR दाखल असल्यास त्यांच्याबाबतीत हे आदेश आपोआप रद्द होतील.

५. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांना अशी विनंती करण्यात येते की, त्यांच्याकडे नियुक्त असलेल्या संबंधित सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) यांना पदोन्नतीचे व सविस्तर नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तात्काळ कार्यमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता किंवा कोणत्याही प्रकारे नियुक्ती रद्द करण्याचे अभिवेदन न करता रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

६. संबंधित अभियंत्यांनी पदोन्नतीने पदस्थापना केलेल्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत रूजू व्हावे अन्यथा, सा.प्र.वि. अधिसूचना दि.१४.७.२०२१ नुसार संबंधित सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) यांचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरूपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

७. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांना कळविण्यात येते की, पदोन्नत अभियंते विहित कालावधीत रूजू न झाल्यास त्याबाबत शासनास त्वरीत अवगत करण्यात यावेत. जेणेकरून परि.५ मध्ये नमूद केल्यानुसार शासन स्तरावर पुढील कार्यवाही करणे शक्य होईल.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१३१८००५४१८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Patil Swati Sachin

Digitally signed by Patil Swati Sachin
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, serialNumber=41a9218232bbaea65861213d86d108ea7c48905da5f33dba9c8f6662cb8f9e18, cn=Patil Swati Sachin
Date: 2021.10.13 18:03:41 +05'30'

**(स्वा.स.पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई पत्राने
३. निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली
४. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
५. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/ निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद, हिंगोली, गोंदिया, सिंधुदूर्ग, नाशिक, अमरावती.

८. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.मा. राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.मा. राज्यमंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२.अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.संबंधित पदोन्नत सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) यांना मुख्य अभियंता (विद्युत), सा.बां. विभाग,मुंबई यांचेमार्फत.
१५.कार्यासन सेवा-३,आस्थापना- १/३, सेवा-६, संगणक कक्ष, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.